**राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत पशुवैद्यक पदवी/पदवीकाधारक/सुशिक्षीतबेरोजगारांमार्फत गाई/म्हशींमध्ये शेतकऱ्यांच्या दारात कृत्रिम रेतनाच्या सुविधा उपलब्ध करुन देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांक:संकीर्ण -२००९/प्र.क्र.३२३/पदुम-४**
**मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :- २४ ऑक्टोबर, २०११.**

वाचा:- १) कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचा शासन निर्णय क्रमांक :संकीर्ण -२००९/प्र.क्र.३२३/पदुम-४, दि.२३.४.२०१०

२) आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.एफबायपी ११(११)/ सी.आर.६०९/पसं.६, दि.११.१०.२०११

३) या विभागाचे पत्र क्र.बैठक-२०११/प्र.क्र.३१४/पदुम-४, दि.१३.१०.२०११ अन्वये मा.मंत्री (पदुम) यांच्या अध्यक्षतेखाली पार पडलेल्या दि.२८.९.२०११ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

शुध्दीपत्रक :- उपरोक्त संदर्भाधिन शासन निर्णय, कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, क्रमांक :संकीर्ण -२००९/प्र.क्र.३२३/पदुम-४, दि.२३.४.२०१० मधील पृष्ठ क्र.४ वरील अनु.क्र.१५ येथील

१५. जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा कृत्रिम रेतन केंद्र यांच्या समितीने जिल्ह्यातील कार्यरत पशुवैद्यकीय संस्थांसाठी १००० पैदासक्षम गाई/म्हशींच्या संख्येच्या मर्यादेत गावांचे कृत्रिम रेतन कार्यासाठी कार्यक्षेत्र निश्चित करावे. इतर गावात कृत्रिम रेतनाच्या सुविधा उपलब्ध करण्यासाठी प्रजननक्षम गाई/म्हशींच्या संख्येनुसार स्वयंसेवी/सेवाभावी संस्थांच्या आणि सेवादात्यांच्या कृत्रिम रेतन केंद्राच्या मुख्यालयाचे ठिकाण व त्याचे कार्यक्षेत्र निश्चित करावे व त्यास आयुक्त पशुसंवर्धन यांची मान्यता घेऊन सदर केंद्रे कार्यान्वित करण्यात यावीत.

**च्या ऐवजी**

१५. जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा कृत्रिम रेतन केंद्र यांच्या समितीने जिल्ह्यातील कार्यरत पशुवैद्यकीय संस्थांसाठी १००० पैदासक्षम गाई/म्हशींच्या संख्येच्या मर्यादेत गावांचे कृत्रिम रेतन कार्यासाठी कार्यक्षेत्र निश्चित करावे. या योजनेअंतर्गत निश्चित करण्यात आलेले कृत्रिम रेतन कार्याचे उद्दिष्ट साध्य होण्याच्या दृष्टीने व पैदासक्षम जनावरांकरिता कृत्रिम रेतन कार्याची व्याप्ती वाढविण्यासाठी आवश्यकतेनुसार मराठवाडा, विदर्भ, कोकण व खानदेश या अविकसित भागात तसेच आदिवासी क्षेत्र, दुर्गम, अतिदुर्गम भागात (मे.जे.के.ट्रस्ट, ठाणे, सहकारी संस्थामार्फत व एन.जी.ओ.इत्यादिमार्फत सध्या कृत्रिम रेतनाच्या सुविधा देण्यात येत आहेत असा भाग वगळून) प्रति ५०० पैदासक्षम गाई/

म्हशींमागे सेवादात्याचे एक कृत्रिम रेतन केंद्र स्थापन करण्यात यावे तसेच उर्वरित भागात प्रति १००० प्रजननक्षम गाई म्हशींमागे १ याप्रमाणे कृत्रिम रेतन केंद्र स्थापन करावे. सदरचे केंद्र स्थापन करण्यासाठी मुख्यालयाचे ठिकाण व त्याचे कार्यक्षेत्र निश्चित करावे व त्यास आयुक्त पशुसंवर्धन यांची मान्यता घेऊन सदर केंद्रे कार्यान्वित करण्यात यावीत.

असे वाचावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(चि.मि.सूर्यवंशी)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.राज्यमंत्री (पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय विभाग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
अवर सचिव, मा.मुख्य सचिव यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (कृषि व पणन), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
आयुक्त, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
आयुक्त(कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई
उप सचिव (राकृवियो कक्ष), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी (सर्व)
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
अतिरीक्त आयुक्त (पशुसंवर्धन), महाराष्ट्र राज्य,पुणे
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला
सह सचिव (दुग्धव्यवसाय विभाग), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त (सर्व)
प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी (सर्व)
जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त (सर्व)
विभागीय व्यवस्थापक, गोठीत रेत प्रयोगशाळा, पुणे, नागपूर, औरंगाबाद (हर्सूल)
अधिक्षक, कृषि अधिकारी (सर्व)
जिल्हा दुग्धव्यवसाय अधिकारी (सर्व)
जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
पशुधन विकास अधिकारी, जिल्हा कृत्रिम रेतन केंद्र (सर्व)
अवर सचिव (पदुम-३), कक्ष अधिकारी (पदुम-१/१६), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
निवड नस्ती.